राष्ट्रीय छात्र सेना कार्यालयांच्या प्रशिक्षण / शिबीरे व इतर उपक्रमांकरीता निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्र :- राछासे-२०२४/प्र.क्र.५७/क्रीयुसे-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-१६ मे, २०२४.

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७.०४.२०१५
२. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.अनुवि-४९२४/(३५/२४) अर्थसंकल्प, दि.०५.०४.२०२४
३. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.राछासे-२०२४/प्र.क्र.५३/क्रीयुसे-३ दि.०७.०५.२०२४
४. सह संचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र.राछासे/निधी मागणी/२०२४-२५/का-५/२७८, दि. ०७.०५.२०२४

**प्रस्तावना :-**

शिक्षण संस्थेतील माध्यमिक, उच्च माध्यमिक व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी सन १९४८-४९ मध्ये राष्ट्रीय छात्रसेना दलाची देशव्यापी स्वरुपात स्थापना करण्यात आली असून राष्ट्रीय छात्रसेनेची तरतूद व रचना करण्याच्या दृष्टीने "राष्ट्रीय छात्रसेना कायदा, १९४८" हा अधिनियम करण्यात आला आहे. त्यानुसार राज्यातील राष्ट्रीय छात्र सेना कार्यालयांकडून राष्ट्रीय छात्र सेनेच्या प्रशिक्षण शिबिरांमार्फत विविध उपक्रम राबविण्यात येत असून सदर प्रशिक्षण शिबिरे व इतर उपक्रमांकरीता रू. ७.५० कोटी ( अक्षरी रूपये सात कोटी पन्नास लक्ष फक्त ) इतका निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** : -

राज्यातील राष्ट्रीय छात्र सेना कार्यालयांकडून राष्ट्रीय छात्र सेनेच्या प्रशिक्षण शिबिरांमार्फत विविध उपक्रम राबविण्यात येत असून सदर प्रशिक्षण शिबिरे व इतर उपक्रमांकरीता रू. ७.५० कोटी (अक्षरी रूपये सात कोटी पन्नास लक्ष फक्त ) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च मागणी क्रमांक- ई-३, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०२, (०१) विद्यार्थ्यांसाठी युवक कल्याण कार्यक्रम (०१)(०१) राष्ट्रीय छात्र सेना (अनिवार्य) २१, पुरवठा व सामग्री (२२०४ ००१६) या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ मध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदर रक्कम कोषागारातून आहरित करणेकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबंधित समादेशक अधिकारी, गट मुख्यालय, राष्ट्रीय छात्र सेना यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय संदर्भ क्रमांक (१) येथील शासन निर्णयासोबतच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-३, अनु. क्र. ४ परि. क्र. २७ (२)(अ) नुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय , सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीपेक्षा जास्त निधी खर्च होणार नाही या अटीच्या अधीन राहून, तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५६६/२०२४, व्यय-५, दि. १५.०५.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०५१६१५१३०९३७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHAILA BABAN YADAV

Digitally signed by SHAILA BABAN YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=a022aa350b02721b783553b5f04e9a637bb746c09f7ca3701d55e5feb1b5b141, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=01B315F80D517C9B1A66011D10F7F68624DB9044C98A741CFD0A1AEF85A9F714, cn=SHAILA BABAN YADAV
Date: 2024.05.16 15:27:02 +05'30'

**( शैला ब. यादव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव ( क्रीडा ), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अतिरिक्त महासंचालक, राष्ट्रीय छात्र सेना संचालनालय, मुंबई
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई (संचालनालयामार्फत)
६. सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
९. संबंधित समादेशक अधिकारी, राष्ट्रीय छात्र सेना, महाराष्ट्र राज्य
१०. अवर सचिव ( अर्थसंकल्प ), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
११. निवड नस्ती, क्रीयुसे-३.